**महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघातील अधिकारी / कर्मचाऱ्यांना ७ व्या वेतन आयोगाची वेतनश्रेणी लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कापूस-२०२१/प्र.क्र.११३/१०-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : ०२ नोव्हेंबर, २०२१.

संदर्भ:- १) महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाचे पत्र क्र. जा.क्र.मुंबई/ प्रशासन/७ वावेआ/१९०२०/२११०, दिनांक १०.०२.२०२०,

२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक : कापूस-२०१०/प्र.क्र. ७४/ १-स, दिनांक ११.०३.२०१३

३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.शासाउ २०१९/प्र.क्र.१३/सा.उ., दिनांक.०४.०८.२०२१

**प्रस्तावना :** -

महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघाच्या संचालक मंडळ सभेने दिनांक २२.११.२०१९ रोजी महासंघाच्या सेवकांना राज्य शासनाच्या धर्तीवर ७ व्या वेतन आयोगाच्या शिफारशी लागू करण्यास मान्यता प्रदान केलेली आहे. यापूर्वी राज्य शासनाने महासंघाच्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना ६ व्या वेतन आयोगाच्या शिफारशी राज्य शासनाच्या अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्या धर्तीवर लागू करण्यास दिनांक ११.०३.२०१३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे. तसेच राज्यातील सार्वजनिक उपक्रमांना ७ व्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्याबाबतचे निकष वित्त विभागाच्या दिनांक ०४.०८.२०२१ च्या शासन निर्णयान्वये ठरविण्यात आले आहेत. या बाबी विचारात घेऊन कापूस पणन महासंघाच्या सेवकांना ७ व्या वेतन आयोगाच्या शिफारशी लागू करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

वित्त विभागाच्या दिनांक ०४.०८.२०२१ च्या शासन निर्णयातील निकषांस अनुसरुन महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघातील अधिकारी / कर्मचाऱ्यांना ७ व्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट अ मधील रकाना क्र.५ प्रमाणे सुधारीत वेतनश्रेणी दिनांक ०१ जुलै, २०२१ पासून लागू करण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) सुधारीत वेतनश्रेणीचा लाभ देताना शासनामधील समकक्ष पदांना लागू करण्यात आलेल्या वेतनश्रेणीपेक्षा महासंघातील अधिकारी/ कर्मचारी यांना मिळणारा लाभ जास्त असू नये. सुधारीत वेतनश्रेण्या त्या मर्यादेत लागू असाव्यात.

२) ७ व्या वेतन आयोगाप्रमाणे सुधारीत सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना अनुज्ञेय करतेवेळी महासंघाने शासनास स्वतंत्रपणे प्रस्ताव सादर करणे बंधनकारक असेल.

३) महासंघाच्या ११३१ पदांच्या आकृतीबंधास दि. ९ ऑगस्ट,२००७ च्या पत्रानुसार पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी मान्यता दिलेली आहे. तथापि महासंघाने यापुढे आकृतीबंधाच्या मान्यतेचा प्रस्ताव शासनास देखील सादर करावा.

४) सदयस्थितीत मंजूर असलेल्या संवर्गातील अधिकारी / कर्मचारी यांनाच सुधारीत वेतनश्रेणीचा लाभ अनुज्ञेय असेल. नवीन संवर्ग / पदे निर्माण केल्यास सदर लाभ अनुज्ञेय करतेवेळी शासनाची पूर्वमंजूरी घेणे आवश्यक राहिल.

५) महासंघातील रिक्त असलेली / झालेली पदे भरणे / नवीन पदे निर्माण करणे याबाबतची कार्यवाही शासनाच्या पूर्वमान्यतेने करणे बंधनकारक असेल.

६) दिनांक १जुलै,२०२१ ते सुधारीत वेतनश्रेणीची अंमलबजावणी करेपर्यंतच्या कालावधीतील थकबाकी एकरकमी किंवा टप्प्याटप्प्याने अदा करणे अथवा भविष्य निर्वाह निधीमध्ये जमा करणे याबाबतचा उचित निर्णय कापूस पणन महासंघाने त्यांच्या स्तरावर घ्यावा. तथापि यामुळे व सुधारीत वेतनश्रेणी लागू केल्यामुळे महासंघ भविष्यात तोट्यात जाणार नाही व येणाऱ्या आर्थिक भाराची जबाबदारी पूर्णपणे महासंघाची राहील. याबाबत शासनाकडून कोणतेही अनुदान उपलब्ध होणार नाही.

७) महासंघाचे उत्पन्न वाढविण्याचा व महासंघ नफ्यात येईल या दृष्टीने सकारात्मक प्रयत्न करणे, महासंघाची उपयुक्तता व कार्यक्षमता सिद्ध करणे आवश्यक असेल.

८) महासंघाकडून राबविण्यात येणाऱ्या योजना/ कामांचा उचित कालबद्ध कार्यक्रम तयार करावा व त्याबाबतचा आढावा शासनास वेळोवेळी सादर करावा.

२. महासंघाने वित्त विभाग/ शासनाकडून ७ व्या वेतन आयोगासंदर्भात निर्गमित करण्यात आलेले, दिनांक ३० जानेवारी, २०१९, दिनांक २०फेब्रुवारी, २०१९, दिनांक ०४ ऑगस्ट, २०२१ व वेळोवेळी निर्गमित करण्यात येणाऱ्या शासन निर्णय / परिपत्रकातील अटी व शर्तीनुसार सुधारीत वेतनश्रेणीची अंमलबजावणी करावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संमतीने व त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ५९/सा.उ., दिनांक ०२.०९.२०२१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२१११०२१३१४२६४२०२ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Ramdas Girjappa Kolekar

Digitally signed by Ramdas Girjappa Kolekar
DN: CN = Ramdas Girjappa Kolekar, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Co-Operation Marketing & Textile Department
Date: 2021.11.02 13:28:55 +05'30'

**( रामदास कोळेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) अध्यक्ष / उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ मर्यादित

२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ मर्या., २०१, जॉली भवन, निर्मला निकेतनच्या समोर, ७-न्यू मरीन लाईन्स, चर्चगेट, मुंबई-४०००२०

३) पणन संचालक, पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

५) अप्पर निबंधक, सहकारी संस्था (लेखापरिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे

६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर.

७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

८) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई

९) उप सचिव (सा.उ.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

१०) उप सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

११) मा.मंत्री (सहकार व पणन) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.

१२) मा.राज्यमंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

१३) निवडनस्ती, १०-स कार्यासन.

**सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र.कापूस-२०२१/प्र.क्र.११३/१०-स,**
**दिनांक ०२ नोव्हेंबर,२०२१**

**परिशिष्ट अ**

महाराष्ट्र राज्य सहकारी संस्था कापूस उत्पादक पणन महासंघातील अधिकारी / कर्मचारी यांच्या सुधारित वेतनश्रेणी बाबतचा तपशील.

| अ.क्र. | पदनाम | ६ व्या वेतन आयोगाप्रमाणे | | ७ व्या वेतन आयोगाप्रमाणे सुधारित वेतन मॅट्रीक्समधील वेतनस्तर |
|---|---|---|---|---|
| | | वेतनश्रेणी पे बँन्ड- | ग्रेड पे. | |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | सरव्यवस्थापक | ३७४००-६७००० | ८७०० | S-२७:११८५००-२१४१०० |
| २. | उपसरव्यवस्थापक | १५६००-३९१०० | ७६०० | S-२५:७८८००-२०९२०० |
| ३. | विभागीय व्यवस्थापक | १५६००-३९१०० | ६६०० | S-२३:६७७००-२०८७०० |
| ४. | व्यवस्थापक | १५६००-३९१०० | ६६०० | S-२३:६७७००-२०८७०० |
| ५. | तांत्रिक अधिकारी | १५६००-३९१०० | ५४०० | S-२०:५६१००-१७७५०० |
| ६. | स्वीय सहाय्यक | ९३००-३४८०० | ५४०० | S-२०:५६१००-१७७५०० |
| ७. | विभागीय उपव्यवस्थापक | ९३००-३४८०० | ५४०० | S-२०:५६१००-१७७५०० |
| ८. | सहाय्यक संचालक | ९३००-३४८०० | ५४०० | S-२०:५६१००-१७७५०० |
| ९. | विक्री अधिकारी | ९३००-३४८०० | ५४०० | S-२०:५६१००-१७७५०० |
| १०. | विमा अधिकारी | ९३००-३४८०० | ५४०० | S-२०:५६१००-१७७५०० |
| ११. | वरीष्ठ उपव्यवस्थापक | ९३००-३४८०० | ५४०० | S-२०:५६१००-१७७५०० |
| १२. | उपव्यवस्थापक | ९३००-३४८०० | ४६०० | S-१६:४४९००-१४२४०० |
| १३. | लेखाधिकारी | ९३००-३४८०० | ४६०० | S-१६:४४९००-१४२४०० |
| १४. | सहाय्यक स्विय सचिव | ९३००-३४८०० | ४६०० | S-१६:४४९००-१४२४०० |
| १५. | सिनिअर ग्रेडर (कृषी) | ९३००-३४८०० | ४४०० | S-१५:४१८००-१३२३०० |
| १६. | जुनिअर ग्रेडर (कृषी) | ९३००-३४८०० | ४२०० | S-१३:३५४००-११२४०० |
| १७. | लेखापाल/कार्यालय अधिक्षक | ९३००-३४८०० | ४२०० | S-१३:३५४००-११२४०० |
| १८. | तांत्रिक सहाय्यक/कॉम्प्युटर पोग्रामर | ९३००-३४८०० | ४२०० | S-१३:३५४००-११२४०० |
| १९. | लघुलेखक | ९३००-३४८०० | ४२०० | S-१३:३५४००-११२४०० |
| २०. | लिपिक | ५२००-२०२०० | १९०० | S-६:१९९००-६३२०० |
| २१. | टंकलेखक | ५२००-२०२०० | २००० | S-७:२१७००-६९१०० |
| २२. | टेलिफोन ऑपरेटर | ५२००-२०२०० | २००० | S-७:२१७००-६९१०० |
| २३. | वाहनचालक | ५२००-२०२०० | १९०० | S-६:१९९००-६३२०० |
| २४. | शिपाईपहारेकरी/ | ४४४०-७४४० | १३०० | S-१:१५०००-४७६०० |
| २५. | सफाईदार | ४४४०-७४४० | १३०० | S-१:१५०००-४७६०० |
| २६. | केअर टेकर | ४४४०-७४४० | १३०० | S-१:१५०००-४७६०० |
| २७. | पालावाली | ४४४०-७४४० | १३०० | S-१:१५०००-४७६०० |

Ramdas Girjappa Kolekar

Digitally signed by Ramdas Girjappa Kolekar
DN: CN = Ramdas Girjappa Kolekar, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Co-Operation Marketing & Textile Department
Date: 2021.11.02 13:29:10 +05'30'

**( रामदास कोळेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**